**केंद्र पुरस्कृत मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) योजनेतंर्गत प्राप्त निधीपैकी राज्य स्तरावर राखून ठेवलेला १% निधी संबधित जिल्हयांना वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक- बीआरजीएफ २०१०/प्र.क्र.१४०/पंरा-६
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
**दिनांक - १९ ऑक्टोबर, २०१०.**

**वाचा :** (१) शासन निर्णय क्रमांक -बीआरजीएफ२००९/प्र.क्र.१३८/पंरा-६, दिनांक ५ नोव्हेंबर,२००९.
(२) शासन निर्णय क्रमांक - बीआरजीएफ२०१०/प्र.क्र.१०३/पंरा-६, दिनांक ३ जुलै,२०१०.
(३) शासन निर्णय क्रमांक - बीआरजीएफ२०१०/प्र.क्र.१०३/पंरा-६, दिनांक ९ जुलै,२०१०.
(४) शासन निर्णय क्रमांक - बीआरजीएफ२०१०/प्र.क्र.१०३/पंरा-६, दिनांक १९ जुलै,२०१०.
(५) शासन निर्णय क्रमांक - बीआरजीएफ२०१०/प्र.क्र.११४/पंरा-६, दिनांक २८ जुलै,२०१०.
(६) केंद्र शासनाचे अ.शा.पत्र क्र.No.N-११०१९/७०८/२०१०-BRGF,दिनांक १६ऑगस्ट,२०१०

**प्रस्तावना :-**

मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना राज्यातील १२ जिल्हयांमध्ये राबविण्यात येत असून, पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार मार्फत सदर योजनेअंतर्गत राज्यातील समाविष्ट १२ जिल्हयांसाठी विकास कामांकरीता प्रतिवर्षी रूपये २५३.५७ कोटी एवढी वार्षिक तरतूद करण्यात आली आहे. योजनेतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त निधी जिल्हयांना वितरीत करताना प्राप्त निधीपैकी १ % निधी राज्य स्तरावरील प्रकल्प व्यवस्थापनाचा खर्च भागविण्यासाठी राखीव ठेवण्यात आला होता. केंद्र शासनाच्या सदर्भाधीन क्रमांक (६) च्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या सुचनांनुसार सदर १% निधी संबंधीत जिल्हयांना परत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भ क्रमांक (१) ते (४) मध्ये नमुद केल्यानुसार सन २००९-१० या आर्थिक वर्षाच्या जिल्हा आराखडयासाठी मंजूर निधी पैकी रुपये २४९.२६ लाख निधी राज्य स्तरावर राखीव ठेवण्यात आला होता. उपरोक्त रुपये २४९.२६ लाख इतका निधी संबधित जिल्हयांना वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. संदर्भ क्रमांक (५) मध्ये नमुद केल्यानुसार सन २०१०-११ या आर्थिक वर्षाच्या जिल्हा आराखडयासाठी ७ जिल्हयांच्या मंजूर निधीमधून राज्य स्तरावर राखीव ठेवण्यात आलेला १% निधी रूपये ८६.२० लाख एवढया निधीपैकी अहमदनगर वगळता इतर ६ जिल्हयांना सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील रकाना ६ नुसार रूपये ६८.६० लाख निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

३.　　　　अशा प्रमाणे एकुण निधी रुपये ३१७.८६ लाख इतका निधी संबधित जिल्हयांना वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

४.　　　　योजनेच्या मार्गदर्शक तत्वानुसार सदर निधी योजनेंतर्गत उच्चाधिकार समिती मार्फत मंजूर जिल्हा आराखडयामध्ये प्रस्तावित केल्यानुसार ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्रकल्प व्यवस्थापन खर्च भागविण्यासाठी खर्च करणे आवश्यक आहे.

५.　　　　सदर निधी हा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांचे अधिनस्त ठेवण्यात यावा, ते या निधीच्या बाबतीत नियंत्रक अधिकारी राहतील. हा निधी मागास क्षेत्र अनुदान निधी योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार व शासनाकडून मंजूर करण्यात आलेल्या आराखडयातील योजनांवर खर्च करण्याची खबरदारी नियंत्रक अधिकाऱ्यांनी घ्यावी. या संबंधीची सर्वस्वी जबाबदारी नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील.

६.　　　　नियंत्रक अधिका-यांनी झालेल्या/होणा-या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयाच्या नोंदीशी ताळमेळ घेवून प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयात नोंद झालेला खर्च यामध्ये तफावत राहणार नाही याबाबत दक्षता घ्यावी आणि खर्चाच्या ताळमेळाचा दर तिमाही अहवाल विहीत मुदतीत सादर करावा. याशिवाय या योजनेच्या मासिक खर्चाचा अहवाल दरमहा १० तारखेपूर्वी शासनास पाठवावा. तसेच सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांना सादर करावे व त्याची प्रत शासनास पाठवावी.

७.　　　　सदर निधी आर.टी.जी.एस. (Real Time Gross Settlement) या बँकींग प्रणाली मार्फत उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

८.　　　　सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१०१०१९१६०३०६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( र. दि. औटे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१)　महालेखापाल, (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई.
२)　महालेखापाल, (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र २ नागपूर.
३)　संचालक लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
४)　विभागीय आयुक्त, औरंगाबाद, अमरावती, नागपूर, नाशिक.
५)　मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
६)　जिल्हाधिकारी, गडचिरोली, भंडारा, चंद्रपूर, गोंदिया, नांदेड, हिंगोली. धुळे, नंदूरबार,अहमदनगर, यवतमाळ, औरंगाबाद, अमरावती. (बीआरजीएफ जिल्हे)

D:\Yogita 1\Yogita1% fund distribution.lwp

७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती,जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (बीआरजीएफ जिल्हे)

८) जिल्हा कोषागार अधिकारी, (बीआरजीएफ जिल्हे)

९) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (बीआरजीएफ जिल्हे).

१०) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (बीआरजीएफ जिल्हे)

११) जिल्हा नियोजन अधिकारी, (बीआरजीएफ जिल्हे)

१२) वित्त विभाग अर्थसंकल्प १७/ व्यय -१५/अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई.

१३) नियोजन विभाग, का. १४१४, १४४४, मंत्रालय, मुंबई.

१४) का.क्र. वित्त-१/वित्त-७/योजना-७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५) निवड नस्ती - का.क्र. पंरा-६,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

(ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्रमांक बीआरजीएफ २०१०/प्र.क्र. १४०/पंरा-६,
दिनांक १९ ऑक्टोबर, २०१० चे विवरण पत्र)

(रूपये लाखात)

| अ. क्र. | जिल्हयाचे नाव | राज्य स्तरावर प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (PMU) खर्चासाठी राखीव ठेवण्यात आलेला १% निधी | | | | या शासन निर्णयान्वये जिल्हानिहाय वितरीत करण्यात आलेला निधी. |
|---|---|---|---|---|---|---|
| | | सन २००९-१० | | | सन २०१०-११ | |
| | | प्रथम हप्ता | दुसरा हप्ता | एकुण | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७(५+६) |
| १ | औरंगाबाद | २१.०३ | २.३४ | २३.३७ | १२.६० | ३५.९७ |
| २ | नांदेड | २१.२७ | २.३६ | २३.६३ | १४.०० | ३७.६३ |
| ३ | हिंगोली | १३.८५ | १.५४ | १५.३९ | ९.०० | २४.३९ |
| ४ | गोंदिया | १४.७६ | १.६४ | १६.४ | ० | १६.४० |
| ५ | भंडारा | १३.६४ | १.५१ | १५.१५ | ८.४० | २३.५५ |
| ६ | चंद्रपुर | २०.१२ | २.२३ | २२.३५ | १२.६० | ३४.९५ |
| ७ | गडचिरोली | १९.८१ | २.२१ | २२.०२ | १२.०० | ३४.०२ |
| ८ | धुळे | १६.८३ | ० | १६.८३ | ० | १६.८३ |
| ९ | अहमदनगर | २७.६१ | ३.०७ | ३०.६८ | - | ३०.६८ |
| १० | नंदुरबार | १५.२८ | १.७० | १६.९८ | ० | १६.९८ |
| ११ | अमरावती | २१.७२ | ० | २१.७४ | ० | २१.७२ |
| १२ | यवतमाळ | २२.२७ | २.४७ | २४.७४ | ० | २४.७४ |
| | **एकुण** | **२२८.१९** | **२१.०७** | **२४९.२६** | **६८.६०** | **३१७.८६** |

(र. दि. औटे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

D:\Yogita 1\Yogita1% fund distribution.lwp